**शिक्षक प्रशिक्षण धोरणातंर्गत सन-२०१८-१९ मधील प्रशिक्षणासाठी अर्थसंकल्पीत केलेला निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राप्रधो- २०१८/प्र.क्र.७९/१८)/प्रशिक्षण**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,

मुंबई ४०० ०३२,

तारीख: ३० जुन, २०१८

**प्रस्तावना -**

प्रशिक्षण धोरणातंर्गत शालेय शिक्षण विभागातील प्रशिक्षणे घेण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु.३००.०० लाख एवढी तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर प्रशिक्षणासाठी मंजूर तरतूदीपैकी ७०% रक्कम रु. २१०.०० लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शिक्षण विभागातील पायाभूत प्रशिक्षण, पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, बदलीनंतरचे प्रशिक्षण, उजळणी प्रशिक्षण व नविन विषय तोंड ओळख इ. प्रशिक्षणांसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता रु.३००.०० लाख एवढया मंजूर तरतूदीपैकी ७०% रक्कम रु. २१०.०० लाख (रुपये दोन कोटी दहा लाख फक्त) इतका निधी संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, (विद्या प्राधिकरण), पुणे यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर खर्च “मागणी क्र.ई-३ २२५१,सचिवालय-सामाजिक सेवा ००३,प्रशिक्षण (००) (००)(०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (२२५११००२) ५०,इतर खर्च” या लेखाशीर्षातून सन-२०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, (विद्या प्राधिकरण), पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या उद्दिष्टांसाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टांसाठी खर्च करावा व त्याबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

वित्त विभागाच्या दि. २/०४/२०१८ च्या परिपत्रकान्वये विभागास असलेल्या निधी वितरणाचे अधिकारस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२११०७५२४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.07.02 11:08:22 +05'30'

**( बी.आर.माळी )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे

३. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे

४. संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे

५. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य पुणे

६. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर

११. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.

१३. सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक व्यवसाय सातत्यपूर्ण विकास संस्था (DIECPD)

१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.

१७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

१८. निवडनस्ती (प्रशिक्षण)